**मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र उभारणी करणेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि २०२५/प्र.क्र. २०/पदुम १३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.

**दि. २६ मार्च, २०२५**

**वाचा:**

१. शासन निर्णय क्रमांक: मत्स्यवि २०१७/प्र.क्र.९०/पदुम १३ दि. ०१.०३.२०१९

२. तत्कालीन मा.मंत्री (वने) यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानाची नियामक मंडळ दि.०२/०८/२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक कांदळवन कक्ष मुंबई यांचे पत्र MFN/DDR & CB/२०२४-२५ दि.०३/१०/२०२४ पत्र

४.आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र.क्र.मत्स्य/निपास /०३१७०१/७५ II/२०१९ दि. २८/११/२०२४

५.आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र.क्र.मत्स्य/निपास /०३१७०१/२६ II/२०१९ दि. ०६/०२/२०२५

६. सचिव ( पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९/०३/२०२५ रोजी झालेली बैठक

**प्रस्तावना -**

राज्याला ७२० कि.मी. चा सागरी किनारा लाभलेला असून राज्यात उत्पादित होणारे सागरी मत्स्योत्पादन हे बहुप्रजातीय स्वरुपाचे आहे. या बहुप्रजातींमध्ये सागरी किनारा व तेथील पर्यावरणासाठी पूरक ठरणाऱ्या विशिष्ट व अनुकुल जातींच्या सागरी प्रजाती उदा., खेकडा (Mudcrab), जिताडा (Seabass), कालव (Oyster), व काकई (Mussles) या प्रजातींचे संवर्धन होणे आवश्यक आहे. या संवर्धनामुळे कांदळवनाचे नैसर्गिकरित्या सहव्यवस्थापन व संरक्षण होण्यासही मदत होणार आहे. सद्यस्थितीत राज्याची खेकडा बीजाची गरज राजीव गांधी सेंटर फॉर ॲक्वाकल्चर (RGCA), चेन्नई या देशातील एकमेव संस्थेमार्फत भागविली जाते. राज्याच्या सागरी किनारपट्टीवरील जनतेस उपजीविकेची साधने देण्याच्या शासनाच्या प्रयत्नांना गतिमानता प्रदान करण्यासाठी विविध प्रजातींचे बीज एकाच ठिकाणी तयार व्हावेत या उद्देशाने राज्यात बहुविध प्रजाती बीज उत्पादन केंद्र स्थापण्याची आवश्यकता विचारात घेवून महाराष्ट्र शासनाने संदर्भाधीन वाचा क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये, मौजे वाघेश्वर (उमादांडा), ता. वेंगुर्ला येथील १.२५ हेक्टर जागेवर बहुप्रजातीय मत्स्यबीज उत्पादन केंद्र स्थापन करणेस मान्यता दिली आहे.

मत्स्यव्यवसाय विभाग आणि कांदळवन कक्ष यांनी MPEDA-RGCA, ICAR-CIBA आणि ICAR-CMFRI सारख्या संस्था मत्स्यबीज उत्पादन केंद्राच्या प्रारूप व कार्यान्वयन करणेकरीता तांत्रिक

सहाय्यासाठी शासनासोबत त्रिपक्षीय सामंजस्य करार देखील केले आहेत. कांदळवन कक्षाच्या सहाव्या नियामक मंडळाच्या बैठकीत सदर प्रकल्पाचे अंदाज पत्रकास तांत्रिक मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तत्कालीन मा.मंत्री (वने) यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानाची नियामक मंडळ दि.०२/०८/२०२४ बैठकीमध्ये प्रक्रिया अंदाजपत्रक, निविदा प्रक्रिया आणि मत्स्यबीज उत्पादन केंद्राच्या बांधकामासाठी प्रशासकीय मंजुरी मत्स्यव्यवसाय विभागाकडून घेण्यात यावी आणि मत्स्यबीज उत्पादन केंद्राच्या बांधकामानंतर मत्स्यव्यवसाय विभागाने उक्त केंद्र पीपीपी तत्वावर चालवावे असे निर्देश दिले आहेत. त्यानुसार वाचा क्र.३ येथे नमुद पत्रान्वये कांदळवन कक्षाने प्रकल्प मत्स्यव्यवसाय विभागास प्रशासकीय मजूरी आणि पुढील कार्यवाहीसाठी वर्ग केला आहे.

मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र उभारणी करणेकरीता रु.२२,२३,९१,०३२/- इतक्या रक्कमेचे अर्थसहाय्य महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठान यांचेकडून प्राप्त होणार असून सदर प्रकल्पाकरीता सल्लागार शुल्क कांदळवन कक्षाकडून अदा करण्यात येत असल्याचे नमूद करून वाचा क्र.४ व ५ येथे नमूद पत्रान्वये आयुक्त कार्यालयाने मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र उभारणी करणेकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

या अनुषंगाने सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९/०३/२०२५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयास अनुसरून मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र उभारणी करणेकरीता रु.२२,२३,९१,०३२/- इतक्या रक्कमेच्या अंदाज पत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयाद्वारे मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र उभारणी करणेकरीता रु.२२,२३,९१,०३२/- इतक्या रक्कमेच्या अंदाज पत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कामाचा तपशील** | **रक्कम (रुपायात)** |
|---|---|---|
| १. | स्थापत्य कामे | १५,३६,५८,१५०/- |
| २. | विद्युत कामे | ३,२७,९२,७८५/- |
| ३. | उपकरणे (Equipments) | १,४६,२७,२०६/ |
| ४. | FRP Tank work | १,१६,८४,७५४/- |
| ५. | सामग्री व प्रयोगशाळा उपकरणे (Accessories & Lab equipments) | ५०,७७,१३७/ |
| ६. | Pre-Operative Expenses | ४५,५१,०००/- |
| | **एकुण** | **२२,२३,९१,०३२/-** |

२. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी प्रकल्पास आवश्यक त्या सर्व परवानग्या प्राप्त करून घेतल्यानंतर कामाला प्रत्यक्ष सुरूवात करावी व कामाची सद्यस्थिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

३. आयुक्त मत्स्यव्यवसाय, प्रस्तावित मत्स्य बिज उत्पादन केंद्र चालविण्याकरिता लागणारा खर्च (operational cost) निश्चित करून केंद्र उभारणीची कालमर्यादा सुनिश्चित करतील.

४. मौजे. वाघेश्वर (उभादांडा) ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे बहुप्रजातीय मत्स्य बिज उत्पादन केंद्र बांधकाम करणे व त्यावर संनियंत्रण करणे याची जबाबदारी आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील.

५. हा प्रकल्प उभारणी नंतर मत्स्यबीज उत्पादन केंद्र विभागाद्वारे चालविण्याची कार्यवाही आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी करावी. याकरिता बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली जि.रत्नागिरी व महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ ,नागपूर यांच्या अंतर्गत येणाऱ्या मत्स्यविज्ञान महाविद्यालय, यांच्यामार्फ़त आधुनिक मत्स्यतंत्रज्ञानाकरिता मार्गदर्शन घेण्यात यावे.

६. प्रकल्प उभारणीसाठी येणार खर्च कांदळवन कक्षाकडून उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा. तसेच सदर प्रकल्पाकरीता सल्लागार शुल्क कांदळवन कक्षाकडून उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा .

७. कामाच्या प्रगतीनुसार शासनाच्या पुर्वमान्यतेने निधी खर्च करण्यात यावा .

वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२११/२०२५/ व्यय -२ दि.२१/०३/२०२५ अन्वये सदरहू प्रस्ताव पाहिलेला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२६११३३५९९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR MAHADEO JAKHATE

Digitally signed by KISHOR MAHADEO JAKHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=032A6ACBFD529D66DD76E26EAB14B28C6DD07D2F776E529B44BA2CB45324C503, cn=KISHOR MAHADEO JAKHATE
Date: 2025.03.26 11:35:06 +05'30'

**( कि.म.जकाते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. प्रधान सचिव (वने) मंत्रालय, मुंबई ३२

७. प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई ३२

८. सचिव (पदुम) मंत्रालय, मुंबई ३२

९.आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई

१०. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक, कांदळवन कक्ष मुंबई

११.कुलसचिव, बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली जि.रत्नागिरी

१२. कुलसचिव महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ ,नागपूर

१३. सह आयुक्त मत्स्यव्यवसाय, निपास, मुंबई.

१४. प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई

१५. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवाय, जि.सिंधुदुर्ग.

१६. महालेखापाल (लेखापरिक्षक / लेखा अनुज्ञेयता) मुंबई

१७. निवड नस्ती पदुम-१३